जिल्हा परिषद डिजीटल पब्लिक स्कूल, खराशी, पंचायत समिती लाखनी, जि. भंडारा या प्राथमिक शाळेला विशेष बाब म्हणून इ.५ वी चा वर्ग सन २०२०-२१ या वर्षापासून जोडण्यास शासन मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्राशाव-२०२० /प्र.क्र.२७/एसएम-५**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२

दिनांक: ३० जून, २०२०

**वाचा :-**

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.प्राशातु-१११२/(२५८/२०१३)/प्राशि-३, दिनांक २/७/२०१३,

२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.प्राशातु-२०१८/२०४ /एस एम- ५ दिनांक १९/०९/२०१९,

३. मुख्य कार्यकारी अधिकारी जि.भंडारा यांचे पत्र क्र.भंजिप/शिक्षण/प्राथ./विअ/१५९०/२०२० दिनांक २० /०३/२०२०,

**शासन निर्णय:-**

जिल्हा परिषद डिजीटल पब्लिक स्कूल, खराशी, पंचायत समिती लाखनी, जि. भंडारा या मराठी माध्यमाच्या (सेमी इंग्रजी) प्राथमिक शाळेला खालील विवरणात दर्शविल्याप्रमाणे इयत्ता ५ वी चा वर्ग जोडण्यास विशेष बाब म्हणून शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | शाळेचे नांव | माध्यम | मंजूर केलेला वर्ग | मंजूर वर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद डिजीटल पब्लिक स्कूल खराशी पंचायत समिती लाखनी जि. भंडारा. | सेमी इंग्रजी | इयत्ता ५ वी | २०२०-२१ |

२. सदर शाळेला सन २०२०-२१ या वर्षापासून इयत्ता ५ वी चा वर्ग जोडण्यास खालील अटींच्या पुर्ततेअधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम २००९ मधील तरतुदीनूसार आवश्यक सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करणे बंधनकारक राहील.

२. शाळेस वर्ग खोली उपलब्ध करण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील.

३. सदर वर्गात विहीत निकषांप्रमाणे पटसंख्या असल्याची खात्री शिक्षणाधिकारी ( प्राथमिक) जिल्हा परिषद, भंडारा यांनी करावी.

४.संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.१९.९.२०१९ मधील अटी व शर्तीची पुर्तता करण्याबाबतची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.भंडारा यांची राहील.

३. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६३०१२३४००६७२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.06.30 15:19:20 +05'30'

**( इ.मु.काझी )**

**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.

२. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.भंडारा.
७. शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. विभागीय शिक्षण उपसंचालक,नागपूर विभाग, नागपूर.
९. शिक्षणाधिकारी (प्राथमिक) जिल्हा परिषद,भंडारा.
१०. निवडनस्ती एसएम-५.